सन १९८९-९० चे अर्थसंकल्पीय अनुदानाचे
नियंत्रण अधिका-यांना वाटप करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक मप्रन्या-१०८८/सीआर-५५/८९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ६ नोव्हेंबर १९८९.

परिपत्रक :- विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन विधेयक १९८९ संमत केलेले असून ते दि. ३१/३/८९ च्या महाराष्ट्र शासन राजपत्र [असाधारण] भाग चार मध्ये सन १९८९ चा अधिनियम क्रमांक पंधरा म्हणून प्रसिध्द झाले आहे. प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या नवी मुंबई येथील खंडपीठाचे नियंत्रण अधिकारी म्हणून काम पहाणारे विशेष कार्यकारी अधिकारी [प्रबंधक] हे पद जून ८७ मध्ये संपुष्टात आले. मुंबई खंडपीठासाठी नियंत्रण अधिका-याअभावी अनुदानाचे नियत वाटप करण्यात आले नव्हते. मुंबई खंडपीठाचे नियंत्रण अधिकारी म्हणून विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांची नियुक्ती शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. मप्रन्या-१०८९/सीआर-२८/१६-अ दि. १८/७/८९ अन्वये आता करण्यात आलेली असल्याने, उपरोक्त लेखानुदानाचे वाटप सोबतच्या परिशिष्ट "अ" व "ब" मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या नवी मुंबई, नागपूर व औरंगाबाद येथील नियंत्रण अधिका-यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

२. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, काही आहरण व संवितरण अधिकारी योग्य ते संगणक संकेतांक वापरीत नाहीत. त्यामुळे खर्चाचे वर्गीकरण चुकीचे होऊन सदरहू खर्च दुस-या लेखाशीर्षाखाली दाखविला जातो. संगणक प्रपत्रात मागणी क्रमांकानुसार खर्चाचे वर्गीकरण केले जाते व त्याकरीता प्रत्येक विभागाच्या मंजूर अंदाजपत्रकातील तरतुदींनुसार वेगळे संगणक संकेतांक दिलेले आहेत. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणासाठी दिलेला संगणक संकेतांक २०७००४८८ आहे. तेव्हा या संगणक संकेतांकाचा यथायोग्य वापर करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांवर आहे. तरी सर्व नियंत्रण अधिका-यांनी त्यांच्याशी संबंधित खर्चाचा महालेखापालांनी दर्शविलेल्या खर्चाशी मेळ घालण्यासाठी हा एकच संकेतांक वापरावा. तसेच अवलक्ष खर्च लेखानुदानाच्या तरतुदी एवढाच मर्यादीत राहील याची दक्षता घ्यावी. आयुक्त, कोकण विभाग, आयुक्त, औरंगाबाद व आयुक्त, नागपूर यांनी कृपया

...२

त्यांच्या खर्चाचा महालेखापालांच्या खर्चाशी मेळ जयवून त्याबाबत अनुपालन अहवाल व सर्व तपशील शासनास वेळेवर पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद/ठाणे,
विभागीय आयुक्त, कोकण विभाग/नागपूर/औरंगाबाद,
जिल्हाधिकारी नागपूर, औरंगाबाद, ठाणे,
वित्त विभाग [का. अर्थसंकल्प-१३/व्यय-४],
सामान्य प्रशासन विभाग [कार्यासन २५, २६, १९],
निवड फाईल.

सौ. दौंदे
४११८९.

## प रि शि ष्ट "अ"

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक अनुज्ञा-१०८८/कै.नं. ५५/८९/१६-अ दिनांक : ६ नोव्हेंबर १९८९ चे सहपत्र.

| अ.क्र. | नियंत्रक अधिकाऱ्याचे पदनाम | आहरण व संवितरण अधिकारी | मंजूर केलेले अनुदान रुपये | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १. | महसूल आयुक्त, कोकण विभाग | सहाय्यक आयुक्त, कोकण विभाग, मुंबई | ९,३८,८०१ [रु. नऊ लाख, अडतीस हजार आठशे एक] | १९८९-९० या आर्थिक वर्षातील भाडेपट्टी, कर व आकस्मिक खर्चासाठी. तपशील परिशिष्ट "ब" मध्ये पहावा. |
| २. | महसूल आयुक्त, नागपूर | सहायक आयुक्त, नागपूर | १८,६९२ [रु. अठरा हजार, सहाशे ब्याण्णव] | |
| ३. | महसूल आयुक्त, औरंगाबाद | सहायक आयुक्त, औरंगाबाद | ६५,५०७ [रु. पासष्ट हजार पाचशे सात] | |

एकूण रुपये १०,२३,००० [रु. दहा लाख, तेवीस हजार]

सौ. दोदि. ४११८९.

परिशिष्ट "ब"

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण [प्रस्तावित]

| | नवी मुंबई खंडपीठ | नागपूर खंडपीठ | औरंगाबाद खंडपीठ | एकूण |
|---|---|---|---|---|
| | रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| आकस्मिक खर्च | ८१,७७६ | ५,००० | ५,००० | ९१,७७६ |
| भाडेपट्टी व कर | ८,५७,०२५ | १३,६९२ | ६०,५०७ | ९,३१,२२४ |
| एकूण रुपये | ९,३८,८०१ | १८,६९२ | ६५,५०७ | १०,२३,००० |

सौ-दोंद्रि. ४११८९.